**शासकीय समितीच्या अध्यक्षांनी बोलाविलेल्या बैठकांना संबंधित शासकीय अधिकाऱ्यांनी उपस्थित राहण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण २०१६ / प्र. क्र. १७४ / १८ ( र. व का . )**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २९ ऑगस्ट, २०१८.

वाचा : १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : संकीर्ण २०१५ / प्र. क्र. ११ / १८ (र. व का.), दिनांक ११ मार्च, २०१६.

**प्रस्तावना :-**

शासनाने मंत्र्यांचा दर्जा दिलेल्या व्यक्ती / संसद सदस्य / विधानमंडळ सदस्य इत्यादी अशासकीय सदस्यांनी, जनतेच्या हिताचे प्रश्न तसेच सार्वजनिक कामे यांचा निपटारा होण्यास विलंब होऊ नये म्हणून प्रलंबित कामांचा निपटारा होण्यासाठी आयोजित केलेल्या बैठकांना शासकीय अधिकाऱ्यांनी उपस्थित रहावे किंवा कसे याबाबत या विषयीची सर्व परिपत्रके अधिक्रमित करुन दिनांक ११ मार्च, २०१६ चे सर्वसमावेशक सुधारित परिपत्रक निर्गमित करण्यात आले आहे. तथापि ज्या शासकीय समित्यांचे अध्यक्ष हे अशासकीय व्यक्ती किंवा संसद सदस्य किंवा विधानमंडळ सदस्य आहेत, त्यांनी बोलाविलेल्या बैठकांना शासकीय अधिकाऱ्यांच्या उपस्थितीबाबत सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**परिपत्रक :-**

याबाबत याद्वारे असे स्पष्ट करण्यात येते की, ज्या शासकीय समित्यांचे अध्यक्ष हे अशासकीय व्यक्ती किंवा संसद सदस्य किंवा विधानमंडळ सदस्य आहेत, अशा समित्यांच्या अध्यक्षांनी बोलाविलेल्या बैठकांना, बैठकीच्या विषयाशी संबंधित, समितीच्या कार्यक्षेत्रातील संबंधित अधिकाऱ्यांनी उपस्थित राहणे आवश्यक आहे. तथापि इतर संसद सदस्य / विधानमंडळ सदस्य यांना त्यांच्या मतदारसंघातील कामांसंदर्भात बैठक आयोजित करावयाची असेल तर त्यांना दिनांक ११ मार्च, २०१६ च्या परिपत्रकास अनुसरुन सदर बैठक जिल्हाधिकारी यांचे कार्यालयात आयोजित करणे आवश्यक राहील. तरी सर्व विभाग / कार्यालये यांनी सदर सूचनाचे काटेकोरपणे पालन करावे.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेताक २०१८०८२९१७३६०८२६०७ असा आहे. तसेच डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने.

Digitally signed by Samridhi V. Angolkar
Date: 2018.08.29 17:40:28 +05'30'

**( समृद्धी अनगोळकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

५. सर्व सन्माननीय संसद सदस्य, विधानसभा व विधानपरिषद सदस्य,
६. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
७. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
८. मा. महाअधिवक्ता, मा. उच्च न्यायालय,महाराष्ट्र राज्य, मुंबई,
९. प्रधान महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) -१, महाराष्ट्र, मुंबई,
१०. प्रधान महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) -२, महाराष्ट्र, नागपूर,
११. प्रधान महालेखापाल ( लेखापरीक्षा ) -१, महाराष्ट्र, मुंबई,
१२. प्रधान महालेखापाल ( लेखापरीक्षा ) -२, महाराष्ट्र, नागपूर,
१३. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
१४. महाप्रबंधक, मा. मुंबई उच्च न्यायालय, मुंबई,
१५. प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय ( मूळ शाखा ), मुंबई,
१६. प्रबंधक, मा. लोकायुक्त व मा. उप लोकायुक्त यांचे कार्यालय, नवीन प्रशासन भवन, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई,
१७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई, ( पत्राने ),
१८. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१९. मा.मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई,
२०. मा.राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग, मुंबई,
२१. सर्व विभागीय आयुक्त,
२२. सर्व जिल्हाधिकारी,
२३. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२४. सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख /
२५. प्रादेशिक प्रमुख / कार्यालय प्रमुख,
२६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२७. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
२८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
२९. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई ४०००३२,
३०. निवड नस्ती ( कार्यासन १८ ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.